**राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर या विद्यापीठाच्या शताब्दी महोत्सवी वर्षानिमित्त विविध इमारतीचे बांधकाम करण्यासाठी तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: आरटीएम-२०२३/प्र.क्र.१४/विशि-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २४ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना:-**

राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर विद्यापीठाची स्थापना ४ ऑगस्ट १९२३ मध्ये झाली. विद्यापीठाचा परिसर ३७३ एकर मध्ये पसरलेला आहे. मध्य भारतातील सर्वात जुने विद्यापीठ म्हणून नावलौकिक असलेले विद्यापीठ ऑगस्ट, २०२२ मध्ये शंभराव्या वर्षात पदार्पण करीत आहे. त्यामुळे सन २०२२-२३ हे शैक्षणिक वर्ष शताब्दी महोत्सवी वर्ष म्हणून साजरे केले जात आहे. विद्यापीठाने जागतिक स्तरावरील आव्हाने आणि संधी यांची सांगड घालीत आवश्यकतेनुसार धोरणे आखली आहेत. या धोरणातून विद्यार्थी सक्षम, कुशल, कर्तव्यनिष्ठ होण्याच्या तसेच तरुणांना रोजगाराच्या अद्ययावत संधी मिळण्याच्या दृष्टीन विद्यापीठाच्या शताब्दी वर्षानिमित्ताने नविन प्रकल्प राबविण्याचे नियोजन केले आहे. तद्नुषंगाने विद्यापीठाने आधुनिक तंत्रज्ञानाकरीता सोयी-सुविधा उभारण्याकरीता रु.१०७.०७ कोटीची कामे प्रस्तावित केली आहेत.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर या विद्यापीठाच्या शताब्दी महोत्सवी वर्षानिमित्त विद्यापीठ परीसरात विविध बांधकामे करण्याकरीता खालील विवरणपत्रात नमूद स्तंभ क्र.६ नुसार एकुण रु.१०७.०७ कोटीच्या विविध कामांना तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर कामांना आवश्यक रु.१०७.०७ कोटी इतका निधी टप्प्याटप्प्याने उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. यासंदर्भात विद्यापीठाद्वारे सविस्तर अंदाजपत्रक प्राप्त झाल्यानंतर त्यास उच्च स्तरीय सचिव समितीची मान्यता घेऊन सविस्तर बाबनिहाय प्रशासकीय मान्यता व यासाठी आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्याचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

**विवरणपत्र**

| अ. क्र. | प्रकल्प | बांधकाम क्षेत्र फळ Sq.M. | इमारत किंमत (रु.करोड) | प्लांट/मशिनरी साहित्य (रु.करोड) | एकूण खर्च (रु.करोड) |
|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. |
| १. | टेक्नॉलॉजी ॲड एनर्जी पार्क | ६१३४ | २५.९८ | ५.६० | ३१.५८ |
| २. | तांत्रिक कौशल्य विकास केंद्र | ९६९ | ४.२० | २२.७५ | २६.९५ |
| ३. | जागतिक दर्जाचे आंतर क्रिडा संकुल | ९२०० | २७.९७ | २.३० | ३०.२७ |
| ४. | जनतेकरीता प्राचिन इतिहास आणि पुरातत्व संग्रहालय | ६३२ | २.०४ | २.२३ | ४.२७ |
| ५. | आदिवासी इनक्युबेशन आणि कौशल्य विकास केंद्र स्थापन करण्यास लागणाऱ्या पायाभूतसोयी (Infrastructure) उभारण्याकरीता | ३८०० | ११.४० | १.६० | १३.०० |
| | | | | **एकूण** | **१०७.०७** |

२. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर यांनी संबंधित वर्षात विद्यापीठास आवश्यक असलेला निधी उपलब्ध करुन घेण्यासाठी संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत बाबनिहाय सविस्तर प्रस्ताव शासनास सादर करणे आवश्यक राहील. तसेच खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या विविध बांधकामास प्रथम प्रशासकीय मान्यता घेणे आवश्यक असल्याने त्यानुसार आवश्यक बांधकामाचा बाबनिहाय

प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिक्षक अभियंता/मुख्य अभियंता, नागपूर यांच्या मान्यतेने शासनास तातडीने सादर करणे आवश्यक आहे. **बांधकामांच्या प्रस्तावास उच्च स्तरीय सचिव समितीची मान्यता व शासनाची बाबनिहाय प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्याशिवाय तसेच प्रत्यक्षात निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता प्राप्त झाल्याशिवाय कोणतीही बांधकामे हाती घेता येणार नाहीत, याची विद्यापीठाने दक्षता घ्यावी.**

३. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर विद्यापीठाच्या शताब्दी महोत्सवी वर्षानिमित्त येणारा सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (०७) सर्वसाधारण शिक्षणासाठी विद्यापीठांना अनुदाने (अनिवार्य) (२२०२ ०७४५), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

४. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर विद्यापीठासाठी विवरणपत्रामध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित आर्थिक वर्षात तरतूद उपलब्ध करुन घेण्यासाठी त्या-त्या आर्थिक वर्षात खर्चाचे प्रस्ताव संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत शासनास मान्यतेसाठी पाठविण्याची जबाबदारी विद्यापीठाची राहील. त्याचप्रमाणे संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर विद्यापीठाकडून प्राप्त प्रस्तावाची छाननी करुन प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी विनाविलंब पाठविण्याची दक्षता घ्यावी.

५. प्रस्तुत योजनेसाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सहाय्यक संचालक (लेखा), उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून संचालक, (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे हे जबाबदार राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०२१०५८१५९४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.03.02 11:02:09 +05'30'

**(अजित बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे उपसचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
३. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
४. कुलगुरु, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर
५. कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर
६. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे/ नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ नागपूर.
९. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
११. वित्त विभाग, (व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.